**दर्यापूर, जि. अमरावती येथे जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायाधीश यांचे न्यायालय स्थापन करणे, त्यानुषंगाने न्यायीक अधिकारी व कर्मचारीवृद यांची पदे निर्माण करणे व त्यासाठी आवश्यक आवर्ती व अनावर्ती तरतूदीस मान्यता देणे याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र.न्यायस्था २०२५/प्र.क्र.२२/का.१२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-३२
दि. ०६ मार्च, २०२५

वाचा :-१) प्रबंधक (निरिक्षणे-१), मा. उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. बी(डब्ल्यू)ए-१२०९/२०१०/१८४/४५११, दि. २४.०१.२०२५

२) विधि व न्याय विभाग शासन निर्णय क्र. एचटीसी १२२२/८३८/प्र.क्र.१४३/का-३, दि. ०६.०२.२०२४

३) विधि व न्याय विभाग शासन शुद्धीपत्र क्र.एचटीसी १२२२/८३८प्र.क्र.१४३/का-३, दि. १०.१०.२०२४

**प्रस्तावना :-**

राज्यात नवीन न्यायालय स्थापन करण्यास प्रलंबित प्रकरणांची संख्या, न्यायालयासाठी जागेची उपलब्धता व न्यायाधीशांसाठी निवासस्थानाची उपलब्धता ह्या बाबी विचारात घेऊन मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्या मा. नवीन न्यायालय स्थापना समितीकडून मान्यता प्रदान करण्यात येते. सदर मान्यतेच्या अनुषंगाने नवीन न्यायालय निर्मितीचा प्रस्ताव मा. उच्च न्यायालयाकडून शासनास सादर करण्यात येतो. सदर प्रकरणी उक्त निकष पूर्ण होत असल्याने मा. उच्च न्यायालयाच्या नवीन न्यायालय स्थापना समितीने दर्यापूर, जि. अमरावती येथे जिल्हा व सत्र न्यायाधीश हे न्यायालय स्थापन करण्यास वाचा येथील अ.क्र. १ अन्वये मान्यता दिली आहे. तसेच वाचा येथील अ.क्र.२ व अ.क्र. ३ अन्वये नवीन न्यायालयांच्या निर्मितीसाठी न्यायाधीशांची २,८६३ पदे, सहाय्यभूत कर्मचा-यांची ११,०६४ पदे व बाहययंत्रणेची ५,८०३ पदे निर्माण करणे व या पदांमधून नवीन न्यायालय निर्माण करण्यास आवश्यक असलेली पदे टप्प्याटप्प्याने उपलब्ध करुन घेण्यास मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्या मा. नवीन न्यायालय स्थापना समितीने दिलेली मान्यता व नवीन न्यायालय निर्माण करण्यासाठी मंजूर असलेली पदे विचारात घेता दर्यापूर, जि.अमरावती येथे जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायाधीश यांचे न्यायालय स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

दर्यापूर, जि.अमरावती येथील जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायाधीश यांच्या न्यायालयासाठी आवश्यक असलेली निम्नलिखित पदे विधि व न्याय विभाग शासन निर्णय दि. ०६.०२.२०२४ व शासन शुद्धीपत्रक दि.१०.१०.२०२४ अन्वये मंजूर असलेली न्यायाधीशांची २,८६३ पदे, सहाय्यभूत कर्मचा-यांची ११,०६४ पदे व बाहययंत्रणेची ५,८०३ पदे यांमधून उपलब्ध करुन घेण्यास याद्वारे मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदे | पदांची संख्या | वेतनश्रेणी | सेवेचा प्रकार |
|---|---|---|---|---|
| १ | जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायाधीश | ०१ | जे-५ १४४८४०-१९४६६० | नियमित |
| २ | अधिक्षक | ०१ | एस १६ ४४९००-१४२४०० | नियमित |
| ३ | लघुलेखक श्रेणी-१ | ०१ | एस १७ ४७६००-१५११०० | नियमित |
| ४ | वरिष्ठ लिपिक | ०४ | एस ८ २५५००-८११०० | नियमित |
| ५ | कनिष्ठ लिपिक | ०९ | एस ६ १९९००-६३२०० | नियमित |
| ६ | बेलीफ | ०३ | एस ६ १९९००-६३२०० | नियमित |
| ७ | वाहन चालक | ०१ | एस ६ १९९००-६३२०० | बाह्ययंत्रणेद्वारे |
| ८ | पुस्तक बांधणीकार | ०१ | एस ५ १८०००-५६९०० | बाह्ययंत्रणेद्वारे |
| ९ | शिपाई | ०२ | एस १ १५०००-४७६०० | बाह्ययंत्रणेद्वारे |
| १० | पहारेकरी | ०१ | एस १ १५०००-४७६०० | बाह्ययंत्रणेद्वारे |
| ११ | सफाईगार | ०१ | एस १ १५०००-४७६०० | बाह्ययंत्रणेद्वारे |
| | **एकूण पदे २५ (१९ नियमित व ६ बाह्ययंत्रणेद्वारे)** | | | |

२. बाहययंत्रणेद्वारे सेवा घेताना, वित्त विभाग व विधि व न्याय विभाग यांनी वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयांमधील मार्गदर्शक सूचनांचे पालन करण्याची दक्षता संबंधित न्यायालयाने घ्यावी .

३. उपरोक्त नमूद पदे ही भरण्यात आलेल्या दिनांकापासून प्रथमत: दि. ३१.०८.२०२५ पर्यंत चालू ठेवण्यास याद्वारे शासन मंजूरी देण्यात येत असून, सदर अस्थायी पदांना दि.३१.०८.२०२५ नंतर मुदतवाढ घेणे आवश्यक राहील.

४. यासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक जे-१, २०१४- न्यायदान, (१०५) दिवाणी व सत्र न्यायालये, (०२) जिल्हा व सत्र न्यायाधीश, (०२)(०१) जिल्हा व सत्र न्यायाधिश (२०१४ ०१७२) दत्तमत (अनिवार्य) " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येईल. या अनुषंगाने निधी उपलब्धतेबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

५. सदर शासन निर्णय, मा.मंत्रिमंडळाने दिनांक ०६.०३.२०२५ रोजीच्या बैठकीत दिलेली मान्यता व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३३४/व्यय-५, दिनांक ०४.०३.२०२५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३०६१५२२०८७९१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VILAS VASANT GAIKWAD

Digitally signed by VILAS VASANT GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=64f5ab9e019c90ad5db684984df113ed09062245cb9e042be5b12e5aa482fc17, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CD7BB8BAA2D72280DD453A12422482D4768A126C83ECB44E84A8186EED4352A0, cn=VILAS VASANT GAIKWAD
Date: 2025.03.06 15:27:53 +05'30'

**(विलास वसंत गायकवाड)**
**सह सचिव नि विधि सल्लागार, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
५. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
६. मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
७. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
८. मा.उप मुख्यमंत्री (विधि व न्याय ) यांचे प्रधान सचिव मंत्रालय, मुंबई,
९. मा.उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव मंत्रालय, मुंबई,

१०.मा.सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई,
११.सर्व मा.मंत्री यांचे स्वीय सहायक,
१२.मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१३.मा.महाप्रबंधक, उच्च न्यायालय मुंबई,
१४.सर्व अ.मु.स. / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई,
१५.सदस्य सचिव, विधि सेवा प्राधिकरण, मुंबई,
१६.सचालक, अभियोग संचालनालय, मुंबई,
१७.प्रबंधक प्रशासन, मा.उच्च न्यायालय मुंबई, नागपूर, औरंगाबाद व पणजी खंडपीठ,
१८. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जिल्हा व सत्र न्यायालय,अमरावती
१९.सह संचालक, न्यायिक अधिकारी प्रशिक्षण संस्था, उत्तन / नागपूर,
२०.महालेखापाल १, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई,
२१.महालेखापाल २, (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता ) नागपूर,
२२.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२३.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
२४.जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती,
२५.उप जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती,
२६.वित्त विभाग, व्यय ५ / आ.पु.क. मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२७.विधि व न्याय विभागातील सर्व कार्यासने
२८. निवडनस्ती (का.१२)